<u>केंद्र पुरस्कृत योजना सन २०२२-२३</u>

**"व्याघ्र प्रकल्प" या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत आदिवासी क्षेत्र उपयोजना घटकांतर्गत निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०२.२३/प्र. क्र.१०६ (भाग-२)/फ-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : २९ मे, २०२३.

<u>वाचा :-</u>

१. केंद्रीय पर्यावरण, वन आणि हवामान बदल, मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. ४-१ (५८)/ २०२२-पीटी, दिनांक १८.०१.२०२३.
२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२.०४.२०२३.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपुर यांचे पत्र क्र. कक्ष-१/सी/यो/प्र. क्र. २७/जनरल/०३/२०२३-२४, दि.०६.०४.२०२३.
४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपुर यांचे पत्र क्र. कक्ष-१/सी/यो/प्र. क्र. २७/जनरल/१२/२०२३-२४, दि.२६.०४.२०२३.
५. आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक : बीयुडी-२०२२/प्र.क्र.१६/का-६, दिनांक २५.०५.२०२३.

<u>प्रस्तावना :-</u>

सन २०२२-२३ मध्ये "व्याघ्र प्रकल्प" या योजनेअंतर्गत पेंच व्याघ्र प्रकल्प, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, बोर व्याघ्र प्रकल्प, नवेगाव-नागझिरा व्याघ्र प्रकल्प व ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्पाच्या विकासात्मक कामांकरीता सर्वसाधारण घटक, अनुसुचित जाती उपयोजना व आदिवासी क्षेत्र उपयोजनाअंतर्गत रु. ७१५२.७९ लक्ष रक्कमेचा वार्षिक प्रर्वतन अहवाल मंजूर केला आहे. त्यानुसार केंद्र शासनाने रु. ९८५.७३ लक्षचा प्रथम हप्ता मंजूर केला असून त्या अनुरुप राज्य हिस्सा रु. ८०२.४७ लक्ष असा एकूण रु. १७८८.२० लक्ष निधी वितरीत करणे अपेक्षित आहे.

<u>शासन निर्णय :-</u>

सदर शासन निर्णयान्वये "व्याघ्र प्रकल्प" या योजनेअंतर्गत पेंच व्याघ्र प्रकल्प, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, बोर व्याघ्र प्रकल्प, नवेगाव-नागझिरा व्याघ्र प्रकल्प व ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्पाच्या विकासात्मक कामांकरीता आदिवासी क्षेत्र उपयोजना घटकांतर्गत **MH २५५ अंतर्गत रु. १२४.५४६६७ लक्ष व MH २५३ अंतर्गत रु. १७४.३८२ लक्ष** निधी Single Nodal Agency (SNA) खात्यात वळती करून खर्च करण्यास परवनागी देण्यात येत आहे.

(रु. लाखात)

| **Single Nodal Agency (SNA) चा तपशिल** | SNA खात्यामध्ये वळती करावयाची रक्कम | सद्यस्थितीत SNA खात्यात जमा असलेली रक्कम | एकूण रक्कम |
|---|---|---|---|
| Centre Code and Scheme Name -Project Tiger (Non-Recurring) (9155)<br>MH Code - MH 255<br>SNA Code - MHNG00016843<br>SNA Account No - 40472502710 | 124.54667 | 58.71167 | 183.25834 |
| Centre Code and Scheme Name -Project Tiger (Recurring) (9155)<br>MH Code - MH 253<br>SNA Code - MHNG00016838<br>SNA Account No - 40474093033 | 174.382 | 0.00 | 174.382 |

अ) व्याघ्र प्रकल्प या केंद्र पूरस्कृत योजनेंतर्गत विकासात्मक कामांसाठी होणारा खर्च I) अनावर्ती बाबींसाठी केंद्र हिस्सा ६०% करीता रु.७४.७२८ लक्ष लेखाशिर्ष क्रमांक २४०६ A९८२, II) त्यानुरूप राज्य हिस्सा ४०% करीता रु.४९.८१८६७ लक्ष लेखाशिर्ष क्रमांक २४०६ A९९१, III) आवर्ती बाबींसाठी केंद्र हिस्सा ५०% करीता रु. ८७.१९१ लक्ष लेखाशिर्ष क्रमांक २४०६ B००२, IV) त्याअनुरूप राज्य हिस्सा ५०% करीता रु. ८७.१९१ लक्ष लेखाशिर्ष क्रमांक २४०६ B०११ (सोबतच्या विवरणपत्रानुसार) सन २०२३-२४ मध्ये अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे उपलब्ध होणा-या अनुदानातून खर्च करण्यात यावा.

आ) केंद्र शासनाने दिलेल्या मंजूरीनुसार सोबत जोडलेल्या तक्त्यामध्ये जमा असलेली अखर्चित रक्कम रु.५८.७११६७ लक्ष खर्च करण्यास देखील परवानगी देण्यात येत आहे.

इ) सदर शासन निर्णयान्वये वितरीत केलेला निधी PFMS प्रणालीद्वारे खर्च करण्यात यावा. त्याकरीता ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) या उदिष्टांतर्गत उपलब्ध असलेल्या निधीचा विनीयोग करण्यात यावा.

ई) सदर शासन निर्णयान्वये वितरीत केलेला निधी केंद्र शासनाने संदर्भीय पत्रान्वये मान्यता दिलेल्या तपशीलवार कार्यबाबींवर व सदर कामांना सक्षम प्राधिका-याची प्रशासकीय व तांत्रिक मान्यता असल्याखेरीज रक्कम खर्ची टाकण्यात येऊ नये.

उ) वितरीत केलेला निधी केंद्र शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेत विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच केंद्र शासनाने प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

ऊ) प्रस्तावित असलेल्या मोठया बांधकामासाठी शासनाने दिलेल्या सूचना आणि विहीत केलेली कार्यपद्धती अनुसरण्याची जबाबदारी संबंधीत नियंत्रक/अंमलबजावणी अधिकारी यांची राहील.

ऋ) वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे, वित्त विभाग, शासन परिपत्रक अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक : १२.०४.२०२३ चे काटेकोर पालन करावे.

२. सदर निधी नागपूर कोषागारातुन आहरीत करण्यात यावा व त्याकरीता Estate Officer, प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे कार्यालय यांना प्राधिकृत करण्यात येत असून त्यांचा DDO Code ४६०१०००७६१ असा आहे.

३. सदर शासन निर्णय आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक :- बीयुडी-२०२२/प्र.क्र.१६/ का-६, दि.२५.०५.२०२३ व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक :- ४८६/व्यय-१४, दिनांक : २८.०४.२०२३ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे असे नमूद करणे अपेक्षित होते.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०५२९१५५८३०८९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SIDDESH TUKARAM SAWARDEKAR

Digitally signed by SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=7dc40890d791d1b1e6bae88da52eabb63f1f3ab6258c7e318f8c37f3ae7c36f2, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=5712CE2D7A095C22E97EBB8F03C668B12EBA1DB0DD8E284883B7BD7FA74DA65D, cn=SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
Date: 2023.05.29 15:59:26 +05'30'

**( सिध्देश सावर्डेकर )**
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक ( अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पूर्व,नागपूर.
५. मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती.
६. वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प, चंद्रपूर.
७. वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, पेंच-बोर व्याघ्र प्रकल्प, नागपूर.
८. उप वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, नवेगाव-नागझिरा व्याघ्र प्रकल्प, गोंदिया.
९. कोषागार अधिकारी, नागपूर.
१०. महालेखापाल-१/२ (लेखापरीक्षण /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
११. फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२ (निवडनस्ती).

*******

महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक :- डब्ल्युएलपी ०३.३१/प्र.क्र.१०६/भाग-२/फ-१, दिनांक :- २९ मे, २०२३ सोबतचे विवरणपत्र.

**(रु. लाखात)**

| **CONSOLIDATED TSP** | | | |
|---|---|---|---|
| **Budget Head** | **SNA** | **वितरीत रक्कम**<br>**३१-Grants-in-aid** | **SNA खात्यामध्ये जमा** |
| २४०६ A९८२ | MH२५५ | ७४.७२८ | ३५.२२७ |
| २४०६ A९९१ | | ४९.८१८६७ | २३.४८४६७ |
| Total | | १२४.५४६६७ | ५८.७११६७ |
| २४०६ B००२ | MH२५३ | ८७.१९१ | ०.०० |
| २४०६ B०११ | | ८७.१९१ | ०.०० |
| Total | | १७४.३८२ | ०.०० |
| **Grand Total** | | **२९८.९२८६७** | **५८.७११६७** |

******